अचलपूर नगरपरिषद संचलित तंत्रनिकेतन,
अचलपूर या संस्थेतील शिक्षकीय/शिक्षकेतर
कर्मचारी यांच्या समावेशनाबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-१११८/प्र.क्र.९१/१८/तांशि-७**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २८ जानेवारी, २०१९.

**वाचा:-** १) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमयुएन-२०१५/प्र.क्र.१४४/नवि-१८, दि.१६ मार्च,२०१७.
२) या विभागाचा शासन निर्णय क्र.मान्यता-२०१७/प्र.क्र.६९/१७/तांशि-५, दि.१८ नोव्हेंबर, २०१७.
३) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.१२(३)/आस्था/शासन निवेदने/२०१८/२२७७, दि.३१ ऑगस्ट, २०१८.
४) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.४अ/आस्था/२०१८/६२२, दि.१४ सप्टेंबर, २०१८.

**प्रस्तावना :-**

नगर विकास विभागाचा संदर्भाधीन शासन निर्णय दि.१६ मार्च, २०१७ अन्वये अचलपूर नगरपरिषदेच्या तंत्रनिकेतनातील (तात्कालीन) विहित कार्यपध्दतीने नियुक्त व कार्यरत २५ शिक्षक व २५ शिक्षकेतर कर्मचारी मिळून एकूण ५० कर्मचा-यांचे समावेशन उच्च व तंत्र शिक्षण विभागाकडे करण्यास, तसेच सदर तंत्रनिकेतनाच्या १.१ हेक्टर जागेसह, त्यावरील इमारत बांधकाम इमारतीतील साहित्यासह विनामोबदला उच्च व तंत्र शिक्षण विभागाकडे सर्व चल व अचल मालमत्तेसह कायमस्वरूपी हस्तांतरीत करण्यास शासन मान्यता देण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णयास अनुसरून अचलपूर नगरपरिषदेचे तंत्रनिकेतन (तात्कालीन) या संस्थेतील विहित पध्दतीने नियुक्त व कार्यरत शिक्षकीय/शिक्षकेतर कर्मचा-यांचे शासनाकडे रितसर समावेशन करणे आवश्यक होते. त्यानुषंगाने संदर्भाधीन २ येथील शासन निर्णयाद्वारे २१ शिक्षकीय व २२ शिक्षकेतर कर्मचा-यांचे समावेशनास मान्यता देण्यात आलेली आहे. तरी आता उर्वरीतपैकी तत्कालीन नगर परिषद अचलपूर संचलित तंत्रनिकेतन, अचलपूर येथे कार्यरत व पात्र ठरत असलेले श्री.एस.एल.पांढरीकर, अधिव्याख्याता, यंत्र अभियांत्रिकी तसेच, श्री.जी.एम.देशपांडे, डाटा एन्ट्री ऑपरेटर यांचे दि.०१ ऑक्टोबर, २०१७ पासून शासनाकडे समावेशन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

नगर विकास विभागाचा संदर्भाधीन शासन निर्णय दि.१६ मार्च, २०१७ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून अचलपूर नगरपरिषदेचे तंत्रनिकेतन महाविद्यालयाच्या खालील शिक्षकीय व शिक्षकेत्तर कर्मचा-यांची दि.०१ ऑक्टोबर, २०१७ पासून शासकीय तंत्रनिकेतन, अचलपूर येथे समावेशन करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | कर्मचा-यांचे नांव | नियुक्तीचे पदनाम | प्रथम नियुक्तीचा दिनांक | मुळ प्रवर्ग | नियुक्तीचा प्रवर्ग | नियुक्तीच्या वेळची वेतनश्रेणी | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | श्री. श्रीराम लक्ष्मीकांत पांढरीकर | अधिव्याख्याता यंत्र अभियांत्रिकी | १५.१०.१९८५ | खुला | खुला | ६८०-४०-१०००-५०-१२५० | **समावेशनास पात्र** |
| २ | श्री. गिरीष मुरलीधर देशपांडे | प्रयोगशाळा सहायक | ०१.११.१९९३ | खुला | खुला | २६०-१०-३९०-१५-४२०-१५-४९५ | **समावेशनास पात्र** श्री. देशपांडे यांची प्रथम नियुक्ती प्रयोगशाळा सहायक या पदावर झालेली असून दि. ०१.१०.१९९८ पासून डाटा एन्ट्री ऑपरेटर या पदी नियुक्ती झालेली आहे. |
| | | डाटा एन्ट्री ऑपरेटर | ०१.१०.१९९८ | खुला | खुला | १४००-४०-१६००-५०-२३००-६०-२६०० | |

२. उपरोक्त दोन्ही अधिकारी/कर्मचारी यांना संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयातील सर्व अटी लागू रहातील.

३. त्यांचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियमावली, १९८१ च्या नियम ११ नुसार निश्चित करून महाराष्ट्र नागरी सेवा वेतन नियमावली १९८१ च्या नियम ३९.१ मधील पहिल्या परंतुकानुसार त्यांना वेतनवाढ अनुज्ञेय राहील व त्यांचे सदर पदावरील वेतन वित्त विभाग, शासन निर्णय क्र.वेतन-१२८९/प्र.क्र.२/९०/ सेवा-३, दि.२३ मार्च, १९९४ मधील तरतुदीनुसार संस्थास्तरावर निश्चित करण्यात यावे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२८१५३२२४४७०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Jaya Shetty

Digitally signed by Sudhir Jaya Shetty
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, serialNumber=e9d37d499a521b728aeb3dc8ec38b759420308b9fd7816002b4af0ffbf1111d7, cn=Sudhir Jaya Shetty
Date: 2019.01.28 15:41:28 +05'30'

**( सुधीर जया शेट्टी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४. सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

५. संचालक, तंत्रशिक्षण, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

६. सहसंचालक तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालय, अमरावती, (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत).

७. अध्यक्ष, नगर परिषद, अचलपूर, जिल्हा अमरावती,

८. मुख्याधिकारी, नगर परिषद, अचलपूर, जिल्हा अमरावती,

९. प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, अचलपूर, (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत).

१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

११. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती,

१२. कक्ष अधिकारी, कार्यासन क्र.तांशि-५, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय,

१३. निवड नस्ती (तांशि-७).